**अक्कलकोट नगरपरिषदेस यात्राकर**
**अनुदान लागू करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-२०१८/प्र.क्र.०१/नवि-१६**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक: -१६ ऑक्टोबर,२०१८**

वाचा -

(१) शासन निर्णय क्रमांकः नगर विकास व आरोग्य विभाग क्र.जीएनटी १४७७/१८२०/नवि-१०, दि.११.०१.१९७८
(२) शासन निर्णय नगर विकास विभाग क्र.जीईएन २००७/प्र.क्र.१०९/नवि-१६ दि.१७.१२.२००७
(३) शासन पत्र, नगर विकास विभाग क्र.जीएनटी ३०८७/सीआर-६८/८९/नवि-१६, दि.४/११/१९८९
(४) शासन निर्णय क्रमांकः जीएनटी-१०९७/२४९६/(अ)/प्र.क्र.२३४/९७/नवि-१६ दि.५ फेब्रुवारी,१९९९
(५) शासन निर्णय नगर विकास विभाग क्र.याकअ १०२००३/ प्र.क्र.४६ /२००३ / नवि-१६, दि.३१ मार्च,२००५
(६) शासन निर्णय नगर विकास विभाग क्र.याकअ-१००६/प्र.क्र.३४/नवि-१६ दि.२९ मार्च,२००७
(७) शासन निर्णय नगर विकास विभाग क्र.याकअ-२०११/प्र.क्र.१३८/२०११/ नवि-१६ दि.६ जुलै,२०११
(८) शासन निर्णय क्रमांक- संकिर्ण-२०१६/प्र.क्र.१७४/नवि-१६, दिनांक ३ आक्टोंबर,२०१६.
(९) शासन शुद्धीपत्रक क्रमांक-संकिर्ण-२०१६/प्र.क्र.१७४/नवि-१६,दिनांक १० सप्टेंबर,२०१८.

**प्रस्तावना -**

राज्यातील (१) त्र्यंबक (२) आळंदी (३) जेजुरी (४) पंढरपूर (५) तुळजापूर व (६) रामटेक या नगरपरिषदा त्यांच्या क्षेत्रातील यात्रास्थळांच्या ठिकाणी येणाऱ्या यात्राकरुंकडून वसुल करित असलेला यात्रकर बंद करुन संदर्भ क्र. (१) येथील शासन निर्णयान्वये सदर नगरपालिकांना यात्राकर अनुदान देण्याचा शासनाने निर्णय घेतला होता.तसेच संदर्भ क्र.(२) येथील शासन निर्णयान्वये पैठण नगरपरिषदेसाठीही यात्राकर अनुदान अनुज्ञेय करण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे व या प्रमाणे राज्यातील यात्रकर अनुदान अनुज्ञेय असलेल्या नगरपरिषदांची एकूण संख्या आता सात झालेली आहे.भाविकांना किमान आवश्यक सोयी-सुविधा पुरविण्याकरिता संबंधी नगरपरिषदांकडून करण्यात येणाऱ्या खर्चात होणारी उत्तरोत्तर वाढ विचारात घेवुन सदर यात्रकर अनुदानामध्ये शासनाकडून संदर्भाधीन क्र. (३) ते (६) येथील शासन निर्णयान्वये वेळोवेळी वाढ करण्यात आलेली आहे. अक्कलकोट नगरपरिषदेस यात्राकर अनुदान लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

अक्कलकोट नगरपरिषदेस यात्राकर अनुदान लागू करण्याची मागणी संबंधित नगरपरिषद/स्थानिक लोकप्रतिनीधी यांच्याकडून सतत होत आहे. सदर यात्रास्थळांचे महत्व व या ठिकाणी भरणाऱ्या मोठ-मोठया यात्रा, त्याशिवाय दैनंदिन भाविकांची असणारी वर्दळ विचारात घेता, भाविकांना किमान सोयीसुविधा (जसे : स्वच्छता, पाणी पुरवठा, आरोग्य, रस्ते, प्रकाश व्यवस्था व इतर अनुषांगिक मुलभूत सोयी सुविधा) नगरपरिषदांना पुरवाव्या लागतात. त्या परिणामी संबंधित नगरपरिषदांच्या मर्यादित उत्पन्नावर ताण पडतो. सदर नगरपरिषदेस येणाऱ्या भाविकांना किमान सोयीसुविधा उपलब्ध करुन देणे मर्यादित उत्पन्नाचा अभावी शक्य होत नाही.याकरिता अक्कलकोट नगरपरिषदेस दरवर्षी रू. २,००,००,०००/-(अक्षरी रक्कम रूपये दोन कोटी मात्र) यात्राकर अनुदान लागू करण्याचा निर्णय सदर शासन निर्णयान्वये घेण्यात येत आहे.

२. संदर्भाधीन क्र. (८) व (९) मधील सर्व अटी व शर्थी लागू राहतील.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र संकिर्ण-१६१८/प्र.क्र.७/व्यय-३, दि.०१.०६.२०१८ अन्वये दिलेल्या अभिप्रायानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८१०१६१८२३०४७७२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vivek Shankar Kumbhar

Digitally signed by Vivek Shankar Kumbhar
DN: CN = Vivek Shankar Kumbhar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Urban Development Department
Date: 2018.10.16 18:47:47 +05'30'

**(विवेक कुंभार)**

**अवर सचिव,नगर विकास विभाग**

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई-३२
२. मा.राज्यमंत्री (नवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३. मा.मुख्य सचिवांचे उप सचिव, मुख्य सचिव कार्यालय, मंत्रालय,मुंबई-३२
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई-३०
६. विभागीय आयुक्त पुणे, नाशिक, औरंगाबाद, नागपूर
७. जिल्हाधिकारी, पुणे, नाशिक, सोलापूर, औरंगाबाद,उस्मानाबाद, नागपूर

८. मुख्याधिकारी, त्र्यंबक नगरपरिषद, आळंदी नगरपरिषद, जेजुरी नगरपरिषद, पंढरपूर नगरपरिषद, तुळजापूर नगरपरिषद, रामटेक नगरपरिषद, पैठण नगरपरिषद,अक्कलकोट नगरपरिषद.

९. महालेखापाल महाराष्ट्र १, मुंबई/महाराष्ट्र २, नागपूर

१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

११. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे, नाशिक, सोलापूर, औरंगाबाद, उस्मानाबाद, नागपूर

१२. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई

१३. संबंधीत उपलेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा

१४.कक्ष अधिकारी नवि ४, १७, १८, १९, ३१ नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१५.निवड नस्ती (नवि-१६